**वस्तू व सेवाकर विभागाच्या पुनर्रचने अंतर्गत मुंबई विक्रीकर कायद्यासाठीच्या मंजूर २६४ पदांना मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्र. विकवि-१०२२/प्र.क्र.०८/वि.प्र.४ (२)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २८.०२.२०२२.

वाचा :-(१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विकवि१२११/प्र.क्र.२९१/वि.प्र.४,दि.१८.११.२०११,
(२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विकवि१२१४/प्र.क्र.४१८/वि.प्र.४,दि.१४.०१.२०१५,
(३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विकवि१२१५/प्र.क्र.२२४/वि.प्र.४,दि.८.०७.२०१५,
(४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विकवि१२१६/प्र.क्र.१५८/वि.प्र.४,दि.२८.०७.२०१६, दि.१३.१०.२०१६, दि.२८.०२.२०१७, दि.१६.१०.२०१७,
(५) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विकवि१२१८/प्र.क्र.५/वि.प्र.४,दि.२९.०१.२०१८, दि.२०.०३.२०१८,
(६) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र.८/आ.पु.क., दि.१०.०२.२०१७, दि.०३.१०.२०१७, दि.८.०१.२०१८, दि.५.०३.२०१८, दि.७.०९.२०१८, दि.२१.०२.२०१९, दि.११.०९.२०१९, दि.१२.०२.२०२०, दि.३१.०८.२०२०, दि.१५.०२.२०२१, दि.१०.०८.२०२१ व दि.२२.०२.२०२२
(७) राज्यकर आयुक्त कार्यालयाचे पत्र क्र.विविआ/आस्था-३/पुनर्रचना कक्ष/२०१६/प्र.क्र.८९ दि.२८.०८.२०१८,
(८) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक संकीर्ण-२०१८/प्र.क्र.१४९/वि.प्र.४, दि. ०५.१०.२०१८, दि.१२.०३.२०१९, दि.१९.१०.२०१९, दि.२०.०३.२०२० व दि.१४.०९.२०२०,
(९) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विकवि-१०२१/प्र.क्र.२७/वि.प्र.४ (२), दि.१२.०३.२०२१ व दि.२३.०८.२०२१,
(१०) राज्यकर आयुक्त, महाराष्ट्र वस्तू व सेवाकर यांचे पत्र क्र. विकवि-२०११/आस्थापना-३/पुनर्रचना कक्ष/प्र.क्र. ५८-अ/ब-२१६, मुंबई दि.१८.०२.२०२२.

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विकवि-१२११/प्र.क्र.२९१/वि.प्र.४, दि.१८.११.२०११ अन्वये मुंबई विक्रीकर कायद्याअंतर्गत मंजूर २६४ पदांना संदर्भाधीन शासन निर्णयान्वये वेळोवेळी मुदतवाढ देण्यात आली आहे. संदर्भाधीन क्र.९ येथील दि.२३.०८.२०२१ च्या शासन निर्णयान्वये सदर पदांना दि.२८.०२.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे. मुंबई विक्रीकर कायद्यांतर्गत प्रलंबित वसुली व अनुषंगिक कामे यांचा निपटारा करण्यासाठी वस्तू व सेवा कर विभागास सदर पदांची आवश्यकता असल्याने, या पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विकवि-१२११/प्र.क्र.२९१/वि.प्र.४, दि.१८.११.२०११ अन्वये विक्रीकर विभागाच्या पुनर्रचनेचा आढावा घेण्यात आला असून मुंबई विक्रीकर कायद्यांतर्गत २६४ पदांना मान्यता देण्यात आली असून त्यानंतर सदर पदांना वेळोवेळी मुदतवाढ देण्यात आली आहे. संदर्भाधीन क्र.९ येथील दि.२३.०८.२०२१ च्या शासन निर्णयान्वये मुंबई विक्रीकर कायद्याअंतर्गत २६४ पदांना दि.२८.०२.२०२२ पर्यंत

मुदतवाढ देण्यात आलेली आहे. आता सदर पदांना वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि २०१६/ प्र.क्र.८/ १६/ आ.पु.क., दि.२२.०२.२०२२ मधील अटींच्या अधीन दि.०१.०३.२०२२ ते दि.३१.०८.२०२२ पर्यंतच्या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

सदर कालावधीमध्ये कोणत्याही परिस्थितीत मंजूर पदांचा आढावा घेऊन सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेणे आवश्यक आहे. त्यांनतर सुधारीत आकृतीबंध निश्चित करण्याकरिता कालावधी वाढवून देण्यात येणार नाही.

२. यासंदर्भात होणारा खर्च "मागणी क्र.जी-१, प्रधानशीर्ष २०४०, विक्री, व्यापार इत्यादींवरील कर, (००) ००१-संचालन व प्रशासन, (००) (०१) विक्रीकर आयुक्त (२०४० ००४२),०१ वेतन" व "मागणी क्र.जी-१, प्रधानशीर्ष २०४०, विक्री, व्यापार इत्यादींवरील कर,१०१ वसुली खर्च, (०१) वसुली खर्च, (०१) (०१) विक्रीकर विभाग,(२०४० ००५१)०१ वेतन" तसेच "मागणी क्र.जी-१, प्रधानशीर्ष २०२०, उत्पन्न व खर्च यावरील करांची वसुली (००) ००१-संचालन व प्रशासन, व्यवसाय, व्यापार आजिविका व नोकऱ्या यांवरील कर (००) (०१) विक्रीकर आयुक्त (२०२० ००२३) ०१ वेतन" या लेखाशीर्षाखाली त्या-त्या वर्षाकरीता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हे आदेश वित्त विभाग, शासन निर्णय पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.२२.०२.२०२२ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३०३१२०६१८१००५ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरी साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MANJUSHA SALVI

Digitally signed by MANJUSHA SALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5f3fd7897fea9717dd9115f782c19536afee03d1736a0283493a8863fadebb45, pseudonym=592D354BA94FD2176EEA4553236CD33EDCD89F9A, serialNumber=2A02139FD3AC94FCBACD18386C5C6655556F2E876E9782822225D5F1AA558DEC, cn=MANJUSHA SALVI
Date: 2022.03.03 12:08:00 +05'30'

**( मंजुषा साळवी )**
**कार्यासन अधिकारी, वित्त विभाग.**

**प्रति,**

१) राज्यकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२) महालेखापाल (लेखापरीक्षा) १, महाराष्ट्र, मुंबई,
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १, महाराष्ट्र, मुंबई,
४) महालेखापाल (लेखापरीक्षा) २, महाराष्ट्र, नागपूर,
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) २, महाराष्ट्र, नागपूर,
६) विशेष राज्यकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१०) मा.मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
११) मा.राज्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१२) अपर मुख्य सचिव (वित्त) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
१२) प्रधान सचिव (वित्तीय सुधारणा) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
१३) अवर सचिव, प्रशासन-४ व वि.प्र.१,२ व ३/आ.पु.क.,
१४) निवड नस्ती (वि.प्र.४)